अमरावती मध्यवर्ती कारागृहाची तट भिंतीची
चारही बाजूने ५ फूट [१.५ मीटर ] उंची
वाढविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

शासन निर्णय :- क्रमांक- बीएलडी- ३८९५/१[५]पीआरएल-२, म दिनांक- २० मार्च १९९५

वाचा:- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे
पत्र क्र.बीएलडी-१४९४/३९०१/क-३, दिनांक ३१.१२.९४.

निर्णय :- अमरावती मध्यवर्ती कारागृह मुख्य तटभिंतीची उंची कमी असल्यामुळे संरक्षणाच्या दृष्टीने सदर कारागृहाची तटभिंतीची ५ फूट [१.५ मीटर ] उंची वाढविण्यास येणारा अंदाजित खर्च रु. ३,७७,०५०/- [रुपये तीन लाख सत्याहत्तर हजार पन्नास फक्त ] इतक्या खर्चास शासन या आदेशान्वये खालील अटीवर प्रशासकीय मान्यता देत आहे.

१] प्रस्तावित कामास अर्थसंकल्पात उचित तरतूद केल्याखेरीज सदर कामास सुरवात करु नये.

२] यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेली कामे प्राधान्याने हाती घेऊन नंतरच प्रस्तावित काम हाती घ्यावे.

३] सन १९९४-९५ च्या वर्षाखाली संबंधित उपक्षेत्रासाठी असलेल्या तरतुदी मधून नियोजन विभागाच्या दि. ५.१०.९४ च्या कपाती च्या आदेशाच्या अधीन राहून उर्वरित तरतूदींतून खर्च भागवावा.

२. प्रस्तावित बांधकामावरील खर्च -४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१ कार्यालयीन इमारती-२०१ बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना "तुरुंग" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग, व वित्त विभागाच्या सहमतीने अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र. २१२/इमा-२, दि. २ फेब्रुवारी १९९५, क्र. ३३७६/नि. वि./१४११ दि. १५ फेब्रुवारी १९९५, व क्र. सीआर-९१/व्यय-८, दि. २४ फेब्रुवारी १९९५, व तसेच शा. नि. क्र. विअप्र-१०९२/प्र.क्र. ११३/९२/विनियम दि. १ जुन १९९२ सोबतच्या विवरणपत्रातील /अनु. क्र. ४ महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेतील परिच्छेद २७[२] मधील रकाना ६ मध्ये नमूद केलेल्या अटीचे अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ श्री. य. सोनवणे ]

अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे,

कारागृह उपमहानिरीक्षक [मुख्यालय] महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग नागपूर,

अधिक्षक, अमरावती मध्यवर्ती कारागृह अमरावती,

महालेखापाल महाराष्ट्र-२ [लेखा व अनुज्ञेयता] नागपूर.

महालेखापाल महाराष्ट्र -२, [लेखा परीक्षा] नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा अधिकारी, मुंबई,

सार्वजनिक बांधकाम विभाग/इमा-२/अर्थ-२,

नियोजन विभाग /१४११

वित्त विभाग /व्यय-८

निवड नस्ती.